भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा उपअभियंता (यां) संवर्गातील बदलीबाबत

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छत विभाग
शासन आदेश क्रमांक आपना-१३०९/प्र.क्र.१०५/पापु १५
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- ११ सप्टेंबर, २००९

वाचा :- १. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन आदेश क्र. आपना २१०६/प्र.क्र.२४५/पापु १५ दिनांक १० ऑक्टोबर, २००६

२. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्र.आस्था-५/अंदिसा/उप अभि(यां)/२७६/०९ दि.६ एप्रिल, २००९

आदेश:-

संदर्भ क्र.१ येथील दि.१० ऑक्टोबर २००६ च्या आदेशान्वये श्री.अं.दि.सावंत उपअभियंता (यां) यांची प्रशासकीय कारणास्तव यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, बीड येथे बदली करण्यात आली होती. तथापि, श्री.अं.दि.सावंत हे बीड येथे रुजू न होता, ते अनधिकृतरित्या गैरहजर राहिलेले आहेत.

२. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सादर केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन श्री.अं.दि.सावंत, उपअभियंता (यां) यांना रुजू करुन घेण्यात येत असून, त्यांची पदस्थापना यांत्रिकी उपविभाग, जिल्हा परिषद, गोंदिया येथील उपअभियंता (यां) या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येत असून, सदर बदली आदेशाची संबंधितांनी तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने खालील सुचनांचे कटाक्षाने पालन करावे.

अ) श्री.अं.दि.सावंत, उपअभियंता (यां) यांनी त्यांची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

ब) बदली झालेले अधिकारी बदलीच्या ठिकाणी संबंधित कार्यालयात आल्यानंतर त्यांना विनाविलंब हजर करुन घ्यावे. अन्यथा, संबंधित कार्यालयप्रमुखास जबाबदार धरण्यात येईल.

४. हे कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २००९०९१११४१४४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सु.वि.कोळेकर)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
३. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, नागपूर विभाग, नागपूर
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड
६. संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)
७. निवडनस्ती (पापु-१५)